# चला आज मैत्री साजरी करुया




*मैत्री असतेच हक्काचा खांदा*
*जिथं मनातलं मळभ रितं होतं,*
*नुसतं तुझं हसू ऐकलं कि*
*आनंदाचं आभाळसुध्दा थिटं होतं*

*......दिपक साळुंके*


संपादक

भारती सरमळकर (मुंबई)

अतिथी संपादक

दिपक साळुंके (पुणे)

सह संपादक

अहं ब्रह्मास्मि (पुणे)
सोनाली घाटपांडे (पुणे)
स्वप्ना कोल्हे (नाशिक)
सारंग भणगे (पुणे),
सचिन काकडे (मुंबई)



Netअक्षरी

ई-साहित्य प्रकाशन

अंक ३८ दिनांक २ ऑगस्ट २००९

## चला आज मैत्रीवर काही लिहू ........... मैत्री सेलिब्रेट करु...........

विचारही नाही करावा लागला ना, खरंय .....
आहेच मुळी हे एकच अस नातं
जिथे एक मन दुस-या मनाची काळजी घेतं,
हे नात जपतं अगदी आयुष्यभर..........
आणि आयुष्यानंतरही........




ऑगस्ट महिन्याचा पहिला रविवार हा **“फ्रेंडशिप डे”** म्हणून सर्वत्र साजरा केला जातो. त्या निमित्ताने **“नेटाक्षरी”** आज काही मैत्रीचे धागे गुंफणार आहे, काही आठवणींच्या रंगांची उधळण करणार आहे, चला तर तुमचा धागा कुठला? तुमचा रंग कुठला? **“नेटाक्षरी”** च्या ह्या **“फ्रेंडशिप डे”** सेलिब्रेशन मध्ये आपलं आणि आपल्या मित्र आणि मैत्रिणींच मनापासून स्वागत.......

**❁ ह्या सेलिब्रेशन मध्ये आहे ❁**

**मैत्रीचे रेशीम धागे**

**आणि**

**ह्या नात्याची घट्ट विण**



# संपादकीय........

मैत्री म्हणजे मैत्री असते..........
रेशमाच्या धाग्याची विण
जी थोडी घट्ट आणि थोडी सैल असते
मैत्री म्हणजे मैत्री असते

मैत्री म्हणजे मैत्री असते..........
समजुतदारपणाच्या पैठणीला
जशी भांडणाची मस्त किनार असते
मैत्री म्हणजे मैत्री असते

मैत्री म्हणजे मैत्री असते..........
जेव्हा आयुष्य बेदरकारपणे ढकलून देते
तेव्हा तुम्हाला अलगद सावरणारे "पॅराशुट" असते
मैत्री म्हणजे मैत्री असते

मैत्री कशी असते? काय असते? माहित नाही.... पण जेव्हा आपण खुप खुश असतॊ ना तेव्हा ती अवती भवती हवीहवीशी वाटते आणि ऎकांतात मात्र तिच्या कुशीत राहावेसे वाटते. ह्या नात्याची विण तो देव नाही तर दोन अजाण मने बांधतात. थोडी सैल थोडी घट्ट ............. पण कधीही न सुटणारी. मैत्रीच्या ह्या निरागस नात्याला कुणाचीही नज़र न लागॊ आणि हे मैत्रीचे रेशीम धागे माझ्या, तुमच्या आपल्या सर्वांच्या आयुष्याची विण दिवसेंदिवस अधिकाधिक घट्ट करोत हिच सदिच्छा !!!

भारती सरमळकर (मुंबई)
संपादक

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास 'नेटाक्षरी' जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणा-या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय, नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ३५००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्या व्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करुन वाचणा-यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतु असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार ही इच्छा. आपल्या सारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

netaksharee@gmail.com

## .....तुझी माझी मैत्री.....

जस अतूट नातं असतं
पाऊस आणि छत्रीचं
तसच काहीसं असावं
तुझ्या माझ्या मैत्रीचं

अंगरख्याच्या आत असतं
मुलायम अस्तर जरीचं
तसच काहीसं असावं
तुझ्य माझ्या मैत्रीचं

जस हळूवार बंधन असतं
श्रावणाशी सरीचं,
तसच काहीसं असावं
तुझ्या माझ्या मैत्रीचं

जस नातं लाटांचं
किना-याशी खात्रीच ,
तसच काहीसं असावं
तुझ्या माझ्या मैत्रीचं

**अभिजित दाते**





## .....तिची माझी सच्ची मैत्री होती.....

तसं पाहीलं तर
तिची माझी सच्ची मैत्री होती
आज कित्येक वर्षांनी भेटलो
माझ्यासारखीच ती ही....
कोणा एकासाठी एकटी होती

तसं पाहीलं तर
तिची माझी सच्ची मैत्री होती
आजही तिच्याकडे पाहीलं
माझ्यासारखीच ती ही........
माझ्या पाहण्याकडे स्तब्ध बघत होती

तसं पाहीलं तर
तिची माझी सच्ची मैत्री होती
प्रेम बिम काय असत? जाणायची
दोघांपैकी कोणालाच
इतकीशी घाई नव्हती

तसं पाहीलं तर
तिची माझी सच्ची मैत्री होती
बालपणापासून मोठेपणापर्यंत
मनापासून हृदयापर्यंत
एकमेकांची सवय होती

तसं पाहीलं तर
तिची माझी सच्ची मैत्री होती
प्रेम कधी झालच नाही
पण......
मैत्री आमची पक्की होती.

**शशांक नवलकर**



## .....मैत्री ही अशीच असते.....

कधी जवळ कधी लांब उडते
तरी ती मैत्री असते

मैत्रीचे रंग अनेक
असतो त्यात विवेक

मैत्रीचे भाव सुरेख
हिच असे खरी पारख

मैत्रीत मन रमते
आपुलकीची लिंक जुळते

मैत्रीची ओढ विशेष
हिच एक बात खास

मैत्रीचा नसे कधी कंटाळा
रोज मिळे आनंद निराळा

मैत्री असे वरदान
मिळे साथ रात दिन
मैत्री नसे तर जिणे व्यर्थ
संत सांगती एकच अर्थ

मैत्री असे नि:संकोच
न दिसे त्यात खोच

मैत्री कधी हसते कधी रडते
तिच मैत्री हरीभरी खरी ठरते

मैत्रीला एकच बंधन
नसे सीमोलंघन

**वसंताजोबा**

## .....मैत्रीण.....

मैत्रीण माझी आगळी ग
किती किती वेगळी ग
रानफुलांच्या गर्दी मध्ये
गुलाबाची पाकळी ग !

मैत्रीण.... वार सुटलेल
मैत्रीण....उन तापलेल
मैत्रीण म्हणजे आभाळ सार
निळाईने व्यापलेल !



मैत्रीण.... नाव पाण्यातील
मैत्रीण....धून गाण्यातील
मैत्रीण म्हणजे खरी बाजू
आयुष्याच्या नाण्याची !

मैत्रीण....वचक पातीचा
मैत्रीण....गंध मातीचा
मैत्रीण म्हणजे धुंद गारवा
शिशिरामधल्या रातीचा !

मैत्रीण....सोने खाणीतले
मैत्रीण....श्लोक वाणीतले
मैत्रीण म्हणजे आपलेच वागणे
आपल्या आपल्या पाहणीतले !

मैत्रीण....अस्वस्थेचे रान
मैत्रीण....हरवलेले भान
मैत्रीण म्हणजे माझ्यासाठी
परमेशाचे नव वरदान !

**तन्मय पाठक**



## .....मैत्रीच चांदणं.....

मैत्रीच चांदणं
आभाळभर पसरलं
लुकलुकत्या तारकांत
चंद्रबिंब न्हाल

गुलाबी आठवांची
अगणित फुलपाखरे आली
मनाची बंद कुपी
अलगद उलगडून गेली

हातात तेव्हा हात होते
सदैव एकमेकां साथ होते
टींगल टवाळी जरी मुखावर
मनात आपुलकीचे भाव होते

पाउले वा-यावर भिरभिरती
स्वप्नांच्या दुनियेत वावरती
कठीण प्रसंगी मात्र
सदैव एकमेका सावरती
मैत्रीच हे अमूल्य नातं
सर्वांनीच अतोनात जपलेलं
प्रत्येकास जणू ईश्वराने
एकाच धाग्यात गुंफलेलं

सुंदर आठवांनी त्या
मन आजही बहरते
प्रत्येक क्षण आठवून
पुन्हा मनात साठवते

मैत्रीच चांदणं
आज आभाळभर पसरलं
लुकलुकत्या तारकांत
चंद्रबिंब न्हाल

**तृप्ती गडकर**

## .....सेलिब्रेशन.....

चला आपण आज आपली
दोस्ती साजरी करूया

फुलपाखरांच्या पंखांवरचे
रंग होऊन उडूया
आभाळाच्या निळाईवर
ढग होऊन फिरूया
फुलांमधून पानांमधून
निसर्ग होऊन झुलुया

चल आपण आज आपली
दोस्ती साजरी करूया



कधी हसू कधी रूसू
हे तर होतच राहील
राग लोभ रूसवे फुगवे
सा-यांचीच मैफील सजेल
महिन्यांमधून, वर्षामधून
कदाचित संपर्क तुटेल
जीवनाच्या मार्गामध्ये
जुने नवे घडेल बिघडेल

आज मात्र आपण गंभीर
चिंतन दूर ठेवूया
चला आपण आज आपली
दोस्ती साजरी करूया

**प्रभा प्रभुदेसाई**

**Happy Friendship Day**

......मैत्री......



ध्यानि मनी नसताना..एका क्षणी..आयुष्यात मैत्री प्रवेशते..
हिरव्या श्रावणात..हातावर रंगलेल्या..मेंदीसारखी..
आयुष्यभर आठवत राहते..!
मैत्री म्हणजे..एकमेकांना समजणं.. आणि समजावणं असतं..
मैत्री म्हणजे..कधी कधी.. स्वतःलाच आजमावणं असतं...
घट्ट लावलेलं मनाचं दार.. मैत्रीत अलगद उघडतं..
हळव्या मनात जपलेलं 'अलगुज' अवचित ओठांवर येतं..
मैत्री मधुनच जन्म घेतं..निखळ प्रेमाचं रोपटं...
'प्रेम'! परमेश्वरानं माणसाला दिलेली..सर्वात सुंदर गोष्ट !
मित्राचा 'सखा' आणि मैत्रीणीची 'सखी'...
मैत्रीतुनच फुलतात नाती..फुलपाखरासारखी...
इंद्रधनुष्यी रंग लेवुन..फुलपाखरु आकाशात झेपावते..
हिरव्या श्रावणातील मेंदी..आणखीनच रंगत जाते....

चंद्रशेखर महामुनी

# .....BEST FRIEND.....



उलटे सुलटे प्रश्न विचारुन भांडावून सोडायच,
Outing ला गेल्यावर रस्ता चुकला म्हणून रडायच,
खांदे आहेत हज़ार पण अश्रु साठवायला ओंजळ तुच पुढे करणार आहेस
कर Promise, whole life तु माझा BEST FRIEND असणार आहेस.....

दोस्त तु यार तु
म्हणुनच करतोस Care
Breakup च्या वळणावर येऊन थांबलय माझ affair
करतोस हा सगळा गुंता तुच सोडवणार आहेस
कर Promise, whole life तु माझा BEST FRIEND असणार आहेस.....

माझ नाव खोडून तुझ्या नावाने मांडायच
मी रुसली की मुद्दाम जोरजोरात भांडायच
मग माझी समजुत काढायला सारखं मागेमागे फिरणार आहेस
कर Promise, whole life तु माझा BEST FRIEND असणार आहेस.....

माझी स्वप्न जगावेगळी अन तुझ जगच वेगळ
माझ्या दिशा वेगळ्या
तुझ आकाश वेगळ
कुठेही असलास जगात मैत्रीच नात तु जपणार आहेस
कर Promise, whole life तु माझा BEST FRIEND असणार आहेस.....

**चैताली म्हापसेकर**

## ....तु खांद्यावर भार देत नको चालु यार.....

त्याला आपली सवय
भटकायला निघालो
कि 'हा' हसत हसत, गप्पा मारत खांद्यावर
जरावेळानी कळ लागली कि ..... परत

तु खांद्यावर भार देत नको चालु यार
तो हासुन .... चलता है दोस्त...

लहानपणी पण आम्ही सर्व "झुक झुक" खेळायचो
झुक झुक स्टेशन वर पोहोचुन ..
प्रवासी एक एक उतरुन घरी
तरी हा खांद्यावरच...

मग काय? झालं टाळकं सटकल....!
तु खांद्यावर भार देत नको चालु यार....
झिडकारलच एकदा...
परत येउ नको आणि बोलवु पण नको....

त्याने बोलावले नाही पण एकदा निरोपच आला..
गेलॊ...

त्याच्या खोलीच्या भिंती मळकट्लेल्या.....
हाताचे ठसे लागुन लागुन सुन्न वातावरण...

खांदेपालट करताना आता वाटतय म्हणावं
तु खांद्यावर भार देत नको चालु यार
.....अन त्यानं उठुन म्हणावं.. चलता है दोस्त..

**प्राजक्त देशमुख (नाशिक)**



## ....मैत्री (लघु कविता)....

ओळख असली नवी
तरी जुनी वाट्ते
शब्द तुझे तरी
भावना माझी भासते

दोन शब्दात तुझ्या
एक जग लपते
दिसत नाहीस तरी
नजर मला भिडते

कळत नकळत म्हणे
असेच बंध जुळतात
मैत्रीच्या बीजाला
कोवळे अंकुर फुटतात

**रणजीत पराडकर**






# अतिथी संपादकाचे............



नाव काय ? : **दिपक गोविंद साळुंके**
**(फक्त "सई" पुरेसं आहे)**

राहता कुठे ? : शिवरायांच्या पदस्पर्शाने पावन झालेल्या भुमीत, पुण्यात

भ्रमनध्वनी वापरता काय ? : हो बेशक ९६७३० ०३५७७

शिकला असालच ? : हो तृतिय वर्ष वाणिज्य. (निदान सर्टिफिकेटवर तर तसच आहे)

करता काय ? : आकडे मोड - अकाऊंट असिस्टंट

बरं काही नाद वगैरे ? : नाद वा छंद म्हणा, कवितांचा आहे तेवढाच पुरेसा......

तुम्ही आणि कविता कसॆ काय ? : कविता माझ्याजवळ आली की मी कवितेजवळ गेलो, हे निश्चित सांगता येणार नाही. शब्दांच्या ऒढीने एकमेकांच्या जवळ येता येतं हे मला नव्यानेच कळलं

इथे येउन काय मिळालं ? : शब्दांवर श्रद्धा, प्रेम, विश्वास आणि भक्ति असलेली माणसे. इतक्या गॊड माणसांचा सहवास मिळाला की आपोआप गोडवा वाढत गेला. जसजशी माणसे जोडत गेलॊ तसतशी मैत्री या शब्दावरला गाढ विश्वास दृढ होत गेला. आज मैत्री या मोती माळेत विणलेली माणसे खरोखर विलक्षण आहेत.

कवी झाला नसता तर ? : कवी झालो नसतॊ तर सर्वप्रथम ह्या आनंद क्षणाला मुकलॊ असतो. मनावर एक प्रकारच जळमट साचलं असतं आणि चाकोरीबद्ध जीवनातुन रोज ती जळमटं साफ करीत बसलॊ असतॊ, पण नशिबाने ती वेळ येऊ नाही दिली.

# ❀ आयुष्यात काय करायला आवडेल ? : मैत्री ❀

आयुष्यात समोर येईल त्या प्रसंगाशी........
समोर येईल त्या व्यक्तीशी........
सुचेल त्या प्रत्येक शब्दाशी......

मैत्रीला नसते जात
मैत्रीला नसते पात
मैत्रीला असतो सुगंध
जणु फूललेली बाग परसात

मैत्रीला नसते वाणी
मैत्री हे खळखळते पाणी
मैत्रीचा मेघमल्हार
जणु सरवेडी धुंद बरसात

मैत्रीला नसे आकार
मैत्री सगुण निराकार
मैत्री सुदाम्याचे पोहे
जणु भुललेली श्रीमंती साज



मैत्री ही खुल्या मनांची
मैत्री अणू रेणूच्या कणांची
मैत्री खुल्या नभाचे पाश
जणु पसरलेली दिर्घ अनंतात

मैत्रीला नसे आकार
मैत्री सगुण निराकार
मैत्री सुदाम्याचे पोहे
जणु भुललेली श्रीमंती साज

मैत्रीला नसते वय
मैत्रीला कळते सय
मैत्रीच्या जुळता तारा
जणु बहरते सप्त स्वरनाद

मैत्री असते ओंजळ
मैत्री असते दव
मैत्री एक स्पंदन
जणु स्पंदलेले दो अंतरात

मैत्री विशेषांकाच्या दिनी मला अतिथी संपादक म्हणुन निवडल गेलं त्या बद्दल मी नेटाक्षरीचमूचा विशेष आभारी आहे. मला हि या अंकाचा एक भाग होण्याचा, यात सहभाग घेण्याचा आनंद घेता येतोय. त्या बद्दल मी खुप खुप आभारी आहे.

धन्यवाद ......

आपला
**दीपक साळुंके (सईमय)**



**Happy Friendship Day**

समाप्त